धुळे जिल्ह्यातील धुळे तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते, प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.३९/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक-०३ मार्च, २०२३.

**पहावे** :- मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा. क्र./का.५/सा बां प्रा वि ना/प्रआ/ दर्जोन्नत/धुळे( जि. धुळे)/५६४/सन -२०२३, दि.०७/०२/२०२३.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये धुळे जिल्ह्यातील धुळे तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते, प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, धुळे यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, धुळे यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, धुळे यांचा ठराव विचारात घेऊन धुळे जिल्ह्यातील धुळे तालुक्यातील खालील इजिमा व ग्रामा रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रजिमा-४९ ते चिंचवार महाल नुरनगर महाल पांढरी नेर लोणखेडी ते प्रजिमा-५५ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग -१८ | (०/०० ते २५/००) २५.०० कि.मी. | २५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-८२ |
| | **एकूण** | | | **२५.०० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील धुळे जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **२५.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (१५८७.५८० + २५.००) म्हणजेच **१६१२.५८० कि.मी.** इतकी तसेच इतर जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत २५.०० **कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (६६३.२३० - २५.००) म्हणजेच **६३८.२३० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३०६१६२७४७१९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.03.08 13:05:54 +05'30'

**( ग. सं. कचरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) जिल्हाधिकारी, धुळे.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद धुळे.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, धुळे.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) रेखाचित्र शाखा
११) निवडनस्ती.